राज्य राखीव पोलीस बलातील कर्मचा-यांच्या राज्य पोलीस दलात बदली करण्याकरीता विहित अटी व शर्ती

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांक-पीएमएन ०३१४/२०३/प्र.क्र.६८/पोल-५ब
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० डिसेंबर, २०१८

वाचा :- १. शासन परिपत्रक, गृह विभाग क्रमांक-एसआरएफ-०९००/२२३६/प्र.क्र.६६/पोल-३, दि.१९.९.२००१.
२. शासन शुध्दीपत्रक क्रमांक-पीएमएन ०३१४/२०३/प्र.क्र.६८/पोल-५ ब, दि.२१.१०.२०१६.
३. पोलीस महासंचालक यांचे पत्र क्रमांक- पोमसं/६/२२/मॅट केस/ होळंबे/३०९/२०१३, दि.२७.०३.२०१७, दि.३०.०५.२०१७ व दि. ०६.१२.२०१७.

शासन शुध्दीपत्रक :-

राज्य राखीव पोलीस दल नियम १९५९ च्या नियम ६८ व ६९ अन्वये राज्य राखीव पोलीस दलातून राज्य पोलीस दलात बदली करीता सेवेच्या अटी व शर्ती विहीत करण्यात आल्या आहेत. पोलीस महासंचालक यांचे कार्यालयामार्फत सदर बदलीबाबत वेळोवेळी आदेश काढून त्यात बदल करण्यात येत होते. सदर बदल्यांच्या संदर्भात उद्भवणारी न्यायालयीन प्रकरणे लक्षात घेता सर्व आदेशांचे समायोजन करुन बदली संदर्भात शासन स्तरावरुन संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन परिपत्रकांन्वये अटी व शर्ती विहीत करण्यात आल्या आहेत.

२. संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन शुद्धीपत्रकान्वये राज्य राखीव पोलीस बलातून राज्य (जिल्हा) पोलीस दलात पोलीस कर्मचाऱ्यांच्या (सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक व त्या खालच्या संवर्गाकरीता ) बदलीबाबत शासन परिपत्रक दि. १९.०१.२००१ मधील अट क्र. १ व २ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे.

३. आता पोलीस महासंचालक यांच्या संदर्भ क्र.३ अन्वये प्राप्त प्रस्तावावर साकल्याने विचार करुन शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग दि.२१.१०.२०१६ मधील परिच्छेद क्र. २ मधील अट क्र-२ रद्द करण्यात येत असून पुढीलप्रमाणे सुधारीत तरतुद करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे-

**“राज्य राखीव पोलीस बलातून जिल्हा पोलीस दल / इतर घटकात विनंतीवरुन बदलून जाण्याऱ्या कर्मचाऱ्यांची सेवा जेष्ठता निश्चित करताना, संबंधित राज्य राखीव पोलीस बलाच्या कर्मचाऱ्यांचे भरती वर्षे प्रमाण मानले जाईल व राज्य राखीव पोलीस बलातील बदलून जाणारा कर्मचारी ज्या वर्षी राज्य राखीव पोलीस बलात भरती झाला असेल त्या वर्षातील जिल्हा पोलीस दलात भरती झालेल्या सर्व कर्मचाऱ्यांच्या सर्वात शेवटी त्याला सेवाज्येठता दिली जाईल व त्या वर्षात त्याच्या प्रवर्गातील कर्मचारी ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदावरच तो नियुक्तीस पात्र राहील.”**

सदर शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेताक २०१८१२१०१२४९३९६०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2018.12.10 14:58:55 +05'30'

**( संदीप गो. ढाकणे )**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामीण) यांचे स्वीय सहायक
४) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
५) अपर मुख्य सचिव (अपिल व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) सर्व पोलीस आयुक्त,
९) सर्व पोलीस अधिक्षक
१०) सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
११) निवडनस्ती (पोल-५ अ/ब)